सहवीज निर्मिती प्रकल्प राबविण्यासाठी सहकारी साखर कारखान्यांना शासकीय भागभांडवल मंजूर करण्याबाबत.

**भीमा सहकारी साखर कारखाना मर्या., टाकळी सिकंदर, ता. मोहोळ, जि. सोलापूर**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : ससाका-१०१४ /२०३/ प्र.क्र.३५/३-स**

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- १३ फेब्रुवारी, २०१५

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक ससाका-४४०६/ प्र.क्र. ७३/३स, दिनांक २० फेब्रुवारी, २००८

२) शासन निर्णय, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक : अपाऊ -२००७/ प्र.क्र.६९३ / ऊर्जा-७, दि. १४ .१०. २००८.

३) शासन निर्णय, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक : अपाऊ-२००९/ प्र.क्र.१५२८/ऊर्जा-७, दि.३ ऑगस्ट, २००९.

४) शासन पूरकपत्र उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक : अपाऊ-२०१०/ प्र.क्र. ३६०/ऊर्जा-७, दि.३ मार्च, २०११.

५) शासन निर्णय, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक : अपाऊ-२०१२/ प्र.क्र.४९/ऊर्जा-७, दि.१३ फेब्रुवारी,२०१३.

६) शासन निर्णय उद्योग ऊर्जा व कामगार विभाग क्र. बगास- २०१३/प्र.क्र. १६५/ उर्जा ७, दि. ३१ जानेवारी, २०१४

७) साखर आयुक्तालयाचे पत्र क्र. साआ/कोजन/भागभांडवल-भिमा-टाकळी/ २०१४/६९/३६०० दि. १४.०२.२०१४

८) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/ अर्थसंकल्प-३ , दि. ०२ जानेवारी, २०१५.

प्रस्तावना :-

उपरोक्त संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक २० फेब्रुवारी, २००८ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील सहकारी साखर कारखान्यांमार्फत सहवीज निर्मिती प्रकल्प राबविण्याचे धोरण निश्चित करण्यात आले आहे. या धोरणानुसार राज्यात सहकारी साखर कारखान्यांच्या माध्यमातून येत्या तीन वर्षात सहवीज निर्मिती प्रकल्पांमधून १००० मे. वॅट वीजनिर्मिती करण्याचे उद्दिष्ट ठरविण्यात आले आहे. तसेच या धोरणानुसार सहवीज निर्मिती प्रकल्प राबविणाऱ्या सहकारी साखर कारखान्यांना प्रकल्प खर्चाच्या ५% शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येणार आहे. त्या अनुषंगाने प्रकल्प उभारणी व समन्वय समितीने सहवीज प्रकल्पाला आर्थिक व प्रशासकीय मान्यता दिलेल्या **भीमा सहकारी साखर कारखाना मर्या., टाकळी सिकंदर, ता. मोहोळ, जि. सोलापूर** या कारखान्यास देय असलेले ५% शासकीय भागभांडवल मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

दिनांक २० फेब्रुवारी, २००८ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील सहकारी साखर कारखान्यामार्फत सहवीज निर्मिती प्रकल्प राबविण्याबाबतचे धोरण निश्चित करण्यात आले आहे. सदर धोरणाची अंमलबजावणी परिणामकारकरित्या व्हावी म्हणून दि. ६ मार्च, २००८ च्या शासन निर्णयान्वये साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अध्यक्षतेखाली प्रकल्प उभारणी व समन्वय समिती गठित करण्यात आली आहे. सदर समितीने सहवीज निर्मिती प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय, तांत्रिक व आर्थिक मान्यता दिलेल्या **भीमा सहकारी साखर कारखाना मर्या., टाकळी सिकंदर, ता. मोहोळ, जि. सोलापूर या कारखान्यांस रुपये ५,६३,३९,०००/- (रु.पाच कोटी, त्रेसष्ट लाख, एकोणचाळीस हजार फक्त)** एवढे शासकीय भागभांडवल मंजूर करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. सदर मंजूरीच्या अटी व शर्ती सोबतच्या **परिशिष्ट 'अ'** मध्ये नमूद करण्यात आल्या आहेत.

२. या बाबीसाठी सन २०१४-१५ च्या अंदाजपत्रकात रु.२०,००,००,०००/- (रुपये वीस कोटी फक्त) एवढी तरतूद उपलब्ध करुन देण्यात आली आहे. या तरतूदीतून **भीमा सहकारी साखर कारखाना मर्या., टाकळी सिकंदर, ता. मोहोळ, जि. सोलापूर** या कारखान्याचा २५ मेगा वॅट क्षमतेच्या सहवीज निर्मिती प्रकल्प खर्च रु.११२६७.८४ लाख असल्याने कारखान्यास शासकीय धोरणानुसार ५% प्रमाणे रु.५६३.३९ लाख एवढे शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येत आहे.

३. या बाबीसाठी सन २०१४-१५ च्या अंदाजपत्रकात एकूण रुपये २००० लाख एवढी तरतूद उपलब्ध होती.या उपलब्ध तरतूदीमधून उपरोक्त खर्च भागविण्यात यावा व खालील लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा :-

मागणी क्रमांक व्ही. ३,
४४२५,सहकारावरील भांडवली खर्च,
सहकारी साखर कारखाने,
(१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
राज्य योजनांतर्गत योजना
(०३) (०४) सहकारी साखर कारखान्यांना सहवीज निर्मितीसाठी भागभांडवली
अंशदान (४४२५ २१७२)
५४- गुंतवणुका

४. उद्योग, ऊर्जा विभाग व कामगार विभागाने सहवीज निर्मिती प्रकल्पाबाबत दिनांक ३१ जानेवारी, २०१४ च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती जशाच्या तशा लागू राहतील.

५. या शासन निर्णयान्वये **भीमा सहकारी साखर कारखाना मर्या., टाकळी सिकंदर, ता. मोहोळ, जि. सोलापूर** या कारखान्यास सहवीज निर्मिती प्रकल्पासाठी मंजूर करण्यात आलेली शासकीय भागभांडवलाची रुपये ५,६३,३९,०००/- (रु.पाच कोटी, त्रेसष्ट लाख, एकोणचाळीस हजार फक्त)

एवढी रक्कम वितरित करण्याकरीता लेखाधिकारी साखर आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना या आदेशाद्वारे आहरण व संवितरण अधिकारी तसेच, साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यास अनुसरुन आहरण व संवितरण अधिकारी यांनी उपरोक्त रक्कम रुपये ५,६३,३९,०००/- (रु.पाच कोटी, त्रेसष्ट लाख, एकोणचाळीस हजार फक्त) आहरण करुन **भीमा सहकारी साखर कारखाना मर्या., टाकळी सिकंदर, ता. मोहोळ, जि. सोलापूर Bhima Sahakari Sakhar Karkhana Ltd., Takli Sikandar Dist. Solapur. या** सहकारी साखर कारखान्यास अदा करण्यात यावी.

**६.** सदर रक्कमेचा विनियोग कारखाना आवश्यक त्या बाबीकरीताच करीत आहे. याबाबतचे नियंत्रण साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी ठेवावे व याबाबतचा अहवाल शासनास वेळोवेळी सादर करावा. शासकीय भागभांडवलाची रक्कम कारखान्यांना वितरित करण्यापूर्वी सोबत जोडलेल्या परिशिष्ट "अ" मधील अटी व शर्ती कारखान्यास बंधनकारक असल्याचे आहरण व संवितरण अधिकाऱ्याने कारखान्याकडून लिहून घ्यावे. तसेच सदर कारखान्याने त्यांना मंजूर केलेल्या **शासकीय भागभांडवलाचा विनियोग दाखला साखर आयुक्तालयामार्फत शासनास सादर करावा.** सदर भागभांडवलाच्या परतफेडीसाठी संबंधित सहकारी साखर कारखान्याकडून भागभांडवल विमोचन निधी अटी व शर्तीनुसार दरवर्षी योग्य त्या प्रमाणात जमा होतो किंवा नाही याची तपासणी सहसंचालक (उप पदार्थ), साखर आयुक्तालय यांच्यामार्फत करण्यात यावी.

**७.** सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाकडील अनौपचारिक संदर्भ क्र.५१७/१४/व्यय-२, दि.११.११.२०१४ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१३१३४७३५८८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Kavita Kishor Parkar

Digitally signed by Kavita Kishor Parkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kavita Kishor Parkar
Date: 2015.02.13 14:03:46 +05'30'

**(क.कि.पारकर)**
सहसचिव, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री.
२) सर्व मंत्री / राज्यमंत्री.
३) प्रधान महालेखाकार, (लेखापरीक्षा-१ / २), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
४) प्रधान महालेखाकार Vaucher Level Computer Section ( V L C ), मुंबई.
५) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली.

७) संचालक, साखर विकास निधी, कृषि भवन, नवी दिल्ली.

८) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ म., साखर भवन, ११ वा मजला, प्लॉट नं, २३०, नरिमन पॉईंट, मुंबई.

९) महासंचालक, वसंतदादा साखर संशोधन संस्था, पुणे.

१०) मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, मुंबई.

११) संचालक (तांत्रिक) ,महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी, प्रकाशगड, मुंबई.

१२) महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (मेडा), पुणे.

१३) प्रतिनिधी, इंडियन इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी, पवई, मुंबई.

१४) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., मुंबई.

१५) कार्यकारी संचालक, भीमा सहकारी साखर कारखाना मर्या., टाकळी सिकंदर, ता. मोहोळ, जि. सोलापूर

१६) विशेष लेखा परिक्षक, (वर्ग- १) सहकारी संस्था, (साखर), पुणे/ सोलापूर.

१७) प्रादेशिक सहसंचालक (साखर), पुणे

१८) कार्यकारी संचालक, मिटकॉन, कुबेरा चेंबर्स, डॉ. राजेंद्र प्रसाद मार्ग, शिवाजीनगर, पुणे.

१९) जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, पुणे

२०) लेखाधिकारी साखर आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे-५.

२१) ऊर्जा विभाग - ऊर्जा-१ व ऊर्जा - ७, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

२२) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

२३) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

२४) वेब को-ऑर्डिनेटर, कक्ष अधिकारी, १६-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

२५) कक्ष अधिकारी - १३-स / १७-स / २५- स.

२६) निवड नस्ती, ३ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

***********

शासन निर्णय क्र. ससाका १०१४/२०३/प्र.क्र. ३५/३स, दि.१३ फेब्रुवारी, २०१५.

परिशिष्ट "अ"

## सहकारी साखर कारखान्यांना सहवीज निर्मिती प्रकल्प राबविण्यासाठी शासकीय भागभांडवल मंजूरीसाठी अटी व शर्ती

१) संस्था निम्नदर्शित कालावधीमध्ये सहा महिन्यांच्या आंत शासनास ५० टक्के विमोचनीय पसंती भाग देईल.

(अ) कारखान्याकडून त्यास शासनातर्फे मिळालेल्या भागभांडवलाच्या रक्कमेपोटी शासनास ५ वर्षीय "विमोचनीय पसंती भाग" दिले जातील.

(ब) शासनामार्फत मिळालेल्या भागभांडवलाच्या उर्वरित ५० टक्के रक्कमेचे १० वर्षीय विमोचनीय पसंती भाग दिले जातील.

२) कारखान्याने शासनास दिलेल्या विमोचनीय पसंती भागाची परतफेड करण्यासाठी लगेचच त्यास निव्वळ नफा मिळण्यापूर्वी भागभांडवल "विमोचन राखीव निधी " सुरु करावा आणि साखर आयुक्तांनी काही भाग किमान एकूण शासकीय भागभांडवलाच्या १/१० इतकी रक्कम दरवर्षी हया फंडात जमा करावी.

३) उपरोक्त अट क्रमांक (२) मध्ये नमूद केलेल्या भागभांडवल विमोचन राखीव निधीच्या जागी कारखान्यांच्या पोट नियमात जर तशी तरतूद केली असेल तर त्या नुसारचे अधिकारात सभासदाकडून ठेवी (बिनपरतीच्या) स्वीकारुन शासनाचे भागभांडवलाचे विमोचनासाठी वेगळा निधी उभारण्याचा विकल्प कारखान्यास राहील. कारखान्याच्या ज्या संबंधित पोट नियमात अशी स्पष्ट तरतूद असली पाहिजे कि, ठेव म्हणून ठेवलेली रक्कम रोखीत परतफेड केली जाणार नाही. परंतु, शासकीय भागभांडवलाचे विमोचनाची विर्निदिष्ट मुदत पूर्ण झाल्यानंतर प्रत्येक उत्पादक भागधारकांच्या खात्यावर असलेल्या रक्कमेच्या मुल्याचा भाग मिळण्यास तो पात्र राहील.

४) "भागभांडवली विमोचन निधी" आणि वर अट क्रमांक (३) मध्ये नमूद केलेला निधी साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांचे सूचनेनुसार गुंतविता येईल.

५) कारखान्यास त्यांच्या सभासदांस तो सभासद म्हणून असतांना शासनाचे संपूर्ण भागभांडवल परत केल्याशिवाय सभासदास भागभांडवलाचा भाग परत करता येणार नाही. जर सभासद संस्था अवसायनात निघाली तर साखर आयुक्त यांचेकडून घालण्यात येणाऱ्या अटी व नियमास अधीन राहून सभासदांचे भागभांडवल परत करता येईल.

६) संस्थेला कोणत्याही वर्षी एका पेक्षा जास्त हप्ते अदा करण्याची मुभा राहील किंवा संपूर्ण शासकीय भागभांडवलाची रक्कम विहित कालावधीत अदा करील.

७) कारखाना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक बीबीसी- १०६४/३ - जे, दिनांक ९ एप्रिल, १९६३ नमूद केलेल्या चार घटकांतील मागासवर्गीय उमेदवारासाठी नोकरीत ३४ टक्के जागा राखून ठेवली. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एआरव्ही-१०७१/६६६४५४/ डी, दिनांक २९ मार्च, १९७२ मध्ये नमूद केल्याप्रमाणे उपरोक्त ३४ टक्के धरुन

आर्थिक दृष्टया दुर्बल लोकांचा समावेश धरुन एकूण ५० टक्के जागा राखून ठेवल्या जातील. ही टक्केवारी कारखान्यांत मागासलेले उमेदवार व आर्थिक दृष्टया दुर्बल उमेदवार, नवीन नोकर भरती नंतर करताना त्यांना न्याय व योग्य प्रतिनिधीत्व मिळण्याच्या दृष्टीने लागू करण्यात येईल. शासनाच्या प्रचलित आदेशानुसार बढतीचे प्रकरणात २४ टक्के रिकाम्या जागा सेवेत असलेल्या अनुसूचित जाती / नवबौध्द , अनुसूचित जमाती, विमुक्त जाती आणि भटक्या जमाती व्यक्तीसाठी राखून ठेवल्या जातील.

८) आरक्षण पुढे चालू ठेवण्याबाबत जर आरक्षित केलेल्या कोणत्याही जागेकरीता मागासवर्गीय प्रवर्गातील एखादया विशिष्ठ प्रवर्गाचा योग्य उमेदवार नियुक्तीसाठी उपलब्ध होत नसेल तर ते आरक्षण पुढील ५ वर्षे पर्यंत तरतूदीच्या अधीन राहून पुढे चालू ठेवण्यात यावे. तथापि, कोणत्याही भरती प्रसंगी उपलब्ध झालेल्या एकूण जागापैकी आरक्षित पदे मिळून ५० टक्के पेक्षा जास्त पदे एका वेळी उपलब्ध होणार नाही. जर दोन पदे रिक्त असतील तर त्यापैकी एकच पद राहील तर ते पद अनरक्षित समजण्यात येईल. भरतीच्या वेळी ५० टक्के पेक्षा जास्त होणा-या आरक्षित पदांचे आरक्षण त्यानंतरच्या भरती प्रसंगी चालू ठेवण्यात यावे. मात्र हे आरक्षण ५ वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी पुढे चालू ठेवता येणार नाही. या अटीच्या अधिन राहील.

९) सहकारी साखर कारखान्यांच्या सहवीज निर्मिती प्रकल्पाच्या बाबतीत, त्यांनी कारखान्यांचे स्थायी काम करणे, वसाहत, मशिनरीचे फांऊडेशन काम, इ. बाब साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या पूर्व परवानगीनेच मागणी नोंदवावी.

१०) कारखाना शासन, एस.डी.एफ तसेच कारखान्यांच्या प्रकल्पास अर्थसहाय्य करणा-या संस्थेची पूर्व संमती घेतल्याशिवाय कोणतेही डिबेंचर्स आणि कॉन्ट्रॅक्ट लोन काढणार नाही किंवा आपल्या कर्ज घेण्याच्या शक्तीचा वापर करणार नाही.

११) शासन घालून देईल अशा पध्दतीनुसार "लाभांश समानता निधी" उभारल्याशिवाय आणि शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय कारखाना द. सा.द. शे. ६ टक्के पेक्षा अधिक लाभांश देऊ शकणार नाही. “भागभांडवल विमोचन निधी " नंतर लाभांश समानता निधीस प्राधान्य राहील.

१२) शासनाने खरेदी केलेले भाग प्रथमत: " पूर्ण किंमत देय " भाग असतील की, ज्यास संस्था गुंडाळण्यात (अवसायनात) येताना परत मिळण्याचा प्रथम हक्क राहील. परंतु, तत्पूर्वी नफ्यातून किंवा उपरोक्त अट क्रमांक (१) आणि (३) मधून विमोचनीय राहील.

१३) शासकीय भागभांडवल वापरण्यापूर्वी कारखाना वरील अटीच्या संबंधाने त्यांच्या पोट नियमात सुधारणा करील.

१४) जर महालेखापाल, मुंबई/ नागपूर यांनी कारखान्यांच्या हिशोबाची तपासणीची आवश्यकता दर्शविली तर हिशोबाचे सर्व कागदपत्र महालेखापाल, मुंबई / नागपूर यांचेकडून तपासून घेण्यासाठी सादर करील.

१५) कारखाना त्याचा संपूर्ण विमा व्यवसाय महाराष्ट्र शासनाचे इन्श्युरन्स फंडाबरोबर करील.

१६) शासकीय भागभांडवल मिळाल्याचे तारखेपासून सहा महिन्यांच्या आत कारखाना भाग दाखला / दाखले देईल, नाही तर संपूर्ण भागभांडवलांची रक्कम परत करावी लागेल.

१७) यासाठी घालण्यात आलेल्या अटींचा भंग केल्यास, राज्य शासनास संपूर्ण अगर काही अंशी भागभांडवलाची रक्कम परत घेण्याचा अधिकार राहील.

१८) प्रकल्प उभारणीसाठी कारखाना, आर्किटेक्ट आणि स्थायी कामांसाठी कॉन्ट्रक्टर यांची नेमणूक साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अनुमतीने करेल.

१९) सेवेत भरतीसाठी शासनाने मान्य केलेला आकृतीबंध साखर कारखान्यांनी मान्य केला पाहिजे व त्या आकृतिबंधाच्या मर्यादेतच नोकर भरती करण्याची दक्षता घ्यावी.

२०) साखर कारखान्यांच्या महत्वाच्या पदावर काम करणाऱ्या व्यक्तींची उदा. मूख्य शेतकी अधिकारी, सचिव, मुख्य लेखापाल, चिफ केमिस्ट, चिफ इंजिनिअर्स व मुख्य उपविकास अधिकारी इ., अधिका-यांची नेमणूक योग्य त्या पात्र असलेल्या व अनुभव असलेल्या व्यक्तीमधूनच करण्यात यावी व या नेमणुकींना साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची मान्यता घ्यावी व असा अधिकारी प्रतिनियुक्तीवर घेणे साखर कारखान्यास बंधनकारक राहील.

२१) भागभांडवल परतफेड निधीमध्ये पैसा न गुंतविता तो कारखान्याने स्वत:च्या व्यवहारात वापरला तर त्या रक्कमेवर वित्तिय संस्था, केंद्रीय वित्तिय संस्था त्यांच्या कर्जावर ज्या प्रमाणे व्याज आकारणी करतात त्याप्रमाणे व्याज आकारण्यात येईल. सदर निधीची गुंतवणूक महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० च्या तरतुदीनुसार करण्यात यावी.

२२) संस्था व्यावसायिक व अर्हता पात्र "वर्क्स मॅनेजर / पॉवर इंजिनिअर / को- जनरेशन इंजिनिअरची नियुक्ती करील.

२३) राष्ट्रीय सहकारी विकास निगमाला, कारखान्याच्या संचालक मंडळावर त्यांचा प्रतिनिधी नाम निर्देशित करण्याचा हक्क राहील. संचालक मंडळाच्या बैठकीस उपस्थित राहणाऱ्या प्रतिनिधीचा होणारा खर्च कारखान्याकडून केला जाईल.

२४) प्लॉंट आणि मशिनरीच्या ऑर्डर्स राज्यस्तरीय यंत्रसामुग्री खरेदी समिती कडून अंतिम केल्या जातील.

२५) या आदेशात निर्दिष्ट केलेल्या अटींचे उल्लंघन झाल्यास शासकीय भागभांडवलाच्या तसेच कर्जाच्या हिश्श्याची संपूर्ण अथवा काही रक्कम काढून घेण्याचा अधिकार शासनाला राहील किंवा शासकीय भागभांडवलाच्या / कर्जाच्या / हिश्श्याच्या संदर्भात शासन भविष्यात वेळोवेळी ज्या अटी व शर्ती लागू करील त्या कारखान्यावर बंधनकारक राहतील.

२६) अस्तित्वात असलेल्या अटी सुधारणा करण्याचा, किंवा आणखी अटींची भर घालण्याचा अधिकार शासनास राहील.

------------------------------